नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) (पदवीधारक) संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५६००-३९१००+गेड पे रु.६६००) पदावर पदोन्नतीने पदस्थापना देण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
नगर विकास विभाग,
शासन निर्णय क्र.पदोन्न-१३१५/१२२३/प्र.क्र.२०३/२०१५/नवि-२७,
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ३० डिसेंबर, २०१६.

वाचा :- १. संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/ससंनर-पदोन्नती-२०१५/पदवीधारक-नर/प्रशा-१/६१, दि.०४.०८.२०१५.
२. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दि.२८.४.२०१५.
३. सामान्य प्रशासन विभाग, अधिसूचना क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.१५६/कार्या-१२, दि.१६.०७.२०१५.
४. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-२०१५/प्र.क्र.३०३/का.१२, दि.१२.०९.२०१६.

प्रस्तावना :-

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५६००-३९१००+ग्रेड पे रु.६६००) संवर्गातील पदवीधारकांच्या कोट्यातील रिक्त पदे पदवीधारक नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५६००-३९१००+ग्रेड पे रु.५४००) या निम्न संवर्गातील अधिकाऱ्यांच्या पदोन्नतीने भरण्याकरिता विभागीय पदोन्नती समितीची बैठक, दि.०९ सप्टेंबर, २०१६ रोजी नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई येथे घेण्यात आली. विभागीय पदोन्नती समितीने, पदोन्नतीकरिता विचारात क्षेत्रात येणाऱ्या पदवीधारक नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या दि.३१.०३.२०१४ पूर्वीच्या मागील ०५ वर्षाच्या गोपनीय अहवालाची प्रतवारी, नगर रचनाकार संवर्गाची दि.०१.०१.२०१५ रोजीची अंतिम ज्येष्ठतासूची, मागासवर्गीय उमेदवारांच्या बाबतीत जात वैधता प्रमाणपत्रे, विचार क्षेत्रात येणाऱ्या अधिकाऱ्यांनी दि.३१.०३.२०१६ अखेर सादर केलेली मत्ता व दायित्वाची विवरणे, विभागीय चौकशी / न्यायालयीन कारवाई इत्यादि निकष व बाबींचा विचार करुन शिफारस केलेली निवडसूची व सामान्य प्रशासन विभागाने दिलेली सहमती विचारात घेता, सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील पदवीधारकांच्या कोट्यातील रिक्त पदे पदोन्नतीने भरण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापनेवरील खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेल्या पदवीधारक नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांना सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) (वेतनसंरचना पीबी-३ रु.१५६००-३९१००+ग्रेड पे रु.६६००) पदावर खालील अटींच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नती देण्यात येत आहे.

| अ. क्र. | ज्येष्ठता क्रमांक | अधिकाऱ्याचे नांव | जातीचा प्रवर्ग | शेरा |
|---|---|---|---|---|
| १ | ४३ | श्री. रा. म. पवार | खुला | खुल्या पदावर |
| २ | ४४ | श्री. सं. द. धोंगडे | खुला | खुल्या पदावर |
| ३ | ४५ | श्री. द. नि. पवार | खुला | खुल्या पदावर |
| ४ | ४६ | श्री. प्र. ग. नाळे | इ.मा.व. | खुल्या पदावर |

**अटी व शर्ती :-**

**अ.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांविरुद्ध सद्य:स्थितीत कोणतीही विभागीय चौकशी / न्यायालयीन कारवाई प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही.

**ब.** पदोन्नतीचे पद महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या कक्षेतील असल्याने नियमित निवडसूचीवरील पात्रापात्रतेनंतर आणि सदर निवडसूचीस महाराष्ट्र लोकसेवा आयोगाच्या मान्यतेने नियमित केल्यानंतर उक्त अधिकारी हे पदोन्नतीच्या पदावर सेवाज्येष्ठता व अन्य सेवाविषयक लाभ मिळण्यास पात्र ठरतील.

**क.** ज्येष्ठतासूचीनुसार विचारक्षेत्रातील अधिकाऱ्यांची पात्रापात्रता तपासण्यात आली असून या संदर्भात भविष्यात कोणतेही प्रकरण उद्भवल्यास, सामान्य प्रशासन विभागाच्या सहमतीने यथायोग्य निर्णय घेण्यात येईल.

**ड.** उक्त अधिकाऱ्यांच्या जात वैधतेबाबत संबंधित विभाग / कार्यालय (सामाजिक न्याय किंवा आदिवासी विकास विभाग / संबंधित जात पडताळणी कार्यालय) यांच्याकडून खातरजमा करण्यात आली आहे. तथापि, भविष्यात यामध्ये कोणत्याही स्तरावर तफावत आढळून आल्यास संबंधित मागासवर्गीय अधिकाऱ्याची पदोन्नती रद्द करुन आवश्यक ती कार्यवाही करण्यात येईल.

**इ.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांच्या पदोन्नत्या ह्या तात्पुरत्या व मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे प्रलंबित असलेल्या याचिका क्र.२७९७/२०१५ (स्टॅम्प क्र.७२५६/२०१५) (महाराष्ट्र राज्य विरुध्द श्री. विजय घोगरे व इतर) तसेच संलग्न इतर न्यायालयीन प्रकरणामध्ये होणाऱ्या अंतिम निर्णयाच्या अधीन राहतील.

**ई.** उपरोक्त नमूद अटींशिवाय उक्त अधिकाऱ्यांची पदोन्नती त्यांच्या वयाच्या ५०/५५ वर्षाच्या पुढे किंवा अर्हताकारी ३० वर्षाच्या सेवा कालावधीपुढे सेवेत राहण्यास पात्रापात्रता आजमाविण्याच्या निर्णयाच्या अधीन राहील.

**०२.** महाराष्ट्र शासकीय गट-अ व गट-ब (राजपत्रित व अराजपत्रित) पदांवर सरळसेवेने व पदोन्नतीने नियुक्तीसाठी महसूली विभाग वाटप नियम, २०१५, दि.२८ एप्रिल, २०१५ व दि.१६ जुलै, २०१५ मधील तरतुदी व पदोन्नतीने पदस्थापनेकरिता अधिकाऱ्यांनी महसूली विभाग वाटपाकरिता दिलेले पसंतीक्रम विचारात घेऊन पदोन्नत अधिकाऱ्यांना खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार सहायक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) पदावरील पदोन्तीने पदस्थापना देण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकाऱ्यांचे नांव व जात प्रवर्ग | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | वाटप करण्यात येत असलेला महसूली विभाग | पदोन्नतीने नियुक्तीचे कार्यालय |
|---|---|---|---|---|
| १ | श्री. राजेंद्र महादेव पवार | नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, मुख्य कार्यालय, पुणे. | नाशिक | सहायक संचालक, नगर रचना, नंदुरबार शाखा, नंदुरबार. (श्री. दि. ग. सरपाते यांच्या प्रस्तावित बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर) |
| २ | श्री. संतोष दत्तात्रय धोंगडे | सहायक संचालक, नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर. | नाशिक | सहायक संचालक, नगर रचना, जळगांव महानगरपालिका (प्र.नि.) |
| ३ | श्री. दत्तात्रय निवृत्ती पवार | भूमि संपादन विशेष अधिकारी, सोलापूर. | अमरावती | सहायक संचालक, नगर रचना, वाशिम शाखा, वाशिम. (रिक्त पदी) |
| ४ | श्री. प्रभाकर गणपत नाळे | भूमि संपादन विशेष अधिकारी क्र.१४, पिंपरी, पुणे. | पुणे | सहायक संचालक, नगर रचना, सोलापूर शाखा, सोलापूर. (रिक्त पदी) |

**०३.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी पदोन्नत अधिकाऱ्यांना पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होण्याकरिता कार्यकारी आदेश तातडीने निर्गमित करावेत.

**०४.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी विहित कालावधीत रुजू होणे आवश्यक आहे. जे अधिकारी विहित कालावधीत रुजू न होता ते ज्या दिनांकास पदोन्नतीच्या ठिकाणी रुजू होतील, त्या दिनांकापासून पदोन्नत झाल्याचे समजण्यात येईल.

**०५.** जे अधिकारी पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी हजर होणार नाहीत किंवा पदोन्नती स्वीकारणार नाहीत, त्या अधिकाऱ्यांना पदोन्नती नको आहे, असे समजून सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय क्र.एसआरव्ही-१०८७/३१११/प्र.क्र.११/८९/१२, दि.३०.०४.२०११ मधील आदेशानुसार त्यांची पदोन्नती रद्द करण्यात येईल. तसेच अशा अधिकाऱ्यास कालबद्ध पदोन्नती / सेवातंर्गत आश्वासित प्रगती योजना / सुधारित सेवातंर्गत आश्वासित प्रगती योजनेचा पहिला / दुसरा लाभ मंजूर करण्यात आला असल्यास, वित्त विभाग, शासन शुद्धीपत्रक क्र.आप्रयो-१०१५/प्र.क्र.१११/२०१५/सेवा-३, दि.२३ डिसेंबर, २०१५ मधील तरतुदीनुसार सदरचा लाभ काढून घेण्यात येईल. मात्र दिलेल्या लाभाची वसुली करण्यात येणार नाही.

**०६.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येणाऱ्या अधिकाऱ्यांनी पदोन्नती नाकारल्यास, सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय, दि.१२.०९.२०१६ मधील तरतुदीनुसार त्यांचे नांव निवडसूचीतून काढून टाकण्यात येईल. तसेच यानंतर पुढील दोन वर्षी होणाऱ्या निवडसूच्यांमध्ये संबंधित अधिकाऱ्यांची पदोन्नतीसाठीची पात्रता तपासण्यात येणार नाही. तद्नंतर गुणवत्तेप्रमाणे संबंधित अधिकारी पदोन्नतीसाठी पात्र ठरल्यास त्याचा नियमित निवडसूचीत समावेश करण्याबाबत त्यांच्या नांवाचा विचार करण्यात येईल.

**०७.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदग्रहण केल्याच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प न दिल्यास महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ११ (१)(ए) व महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, २००९ मधील नियम १३ (अ) (१) (२) (ब) (१ व २) नुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन त्यांची वेतननिश्चिती करण्यात यावी.

**०८.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांना पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी ज्या दिनांकास हजर होण्यास कळविण्यात आले आहे व ते नियुक्तीच्या ठिकाणी ज्या दिनांकास हजर होतील, याबाबत शासनास तातडीने अवगत करण्यात यावे.

**०९.** या आदेशान्वये पदोन्नती देण्यात येत असलेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीने नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास किंवा राजकीय दबाव आणून नियुक्ती अन्य ठिकाणी करण्याचा प्रयत्न केल्यास, संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात त्यानुसार नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाची कृती ही महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चा भंग करणारी असल्याने संबंधित अधिकाऱ्याविरुद्ध शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, यांची नोंद घेण्यात यावी.

१०. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक **२०१६१२३०१०३१०९०२२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने सांक्षाकिंत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Samadhan Khatkale

Digitally signed by Samadhan Khatkale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=3cc48a0aa3fbc01f7ee956a75c9445a5b81fec5e429c69234939d35b4eaceee0, cn=Samadhan Khatkale
Date: 2016.12.30 13:50:03 +05'30'

**(समाधान खटकाळे)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति :-**

सर्व संबंधित अधिकारी, --------------------------------------------------------- -- यांना संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचेमार्फत.

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-२, नागपूर.
३. मा. मुख्य मंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. आयुक्त, जळगांव महानगरपालिका, जळगांव.
५. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(३-प्रती)**
६. सर्व सह संचालक, नगर रचना, -------------------.
७. सहायक संचालक, नगर रचना, नंदुरबार शाखा, नंदुरबार.
८. सहायक संचालक, नगर रचना, जळगांव महानगरपालिका. जळगांव.
९. सहायक संचालक, नगर रचना, वाशिम शाखा, वाशिम.
१०. सहायक संचालक, नगर रचना, सोलापूर शाखा, सोलापूर.
११. सहायक संचालक, नगर रचना, अहमदनगर शाखा, अहमदनगर.
१२. भूमि संपादन विशेष अधिकारी, सोलापूर.
१३. भूमि संपादन विशेष अधिकारी क्र.१४, पिंपरी, पुणे.
१४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१५. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, नागपूर.
१६. सर्व संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी, ---------------------------------------.
१७. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
१८. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१९. निवडनस्ती -नवि /२७.

*****